नियतकालिक बदल्या सन २०२५
उपआयुक्त (वरिष्ठ श्रेणी) (गट-अ),
राज्य उत्पादन शुल्क.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- इएसटी-१२२५/प्र.क्र.१३६/राउशु-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ३२.
दिनांक :-३० मे, २०२५.

**संदर्भ :-** १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.इएसटी-१२१६/प्र.क्र.७८/राउशु-१,दि.१४.०६.२०१६
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र.इएसटी-१२१६/प्र.क्र.१३५/राउशु-१,दि.१६.०९.२०१६
४) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांचे क्र.ईएसटी ११२०२५/४५/२-अ-१/ दि.२८.०४.२०२५ चा प्रस्ताव

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील नियम ४ (३) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने **उपआयुक्त (वरिष्ठ श्रेणी) (गट-अ), राज्य उत्पादन शुल्क** या संवर्गातील खालील स्तंभ (२) मध्ये नमुद अधिकाऱ्यांची स्तंभ (३) मध्ये नमुद पदावरुन स्तंभ (४) मध्ये दर्शविलेल्या पदावर बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | विद्यमान पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री.सुभाष बोडके | उपआयुक्त (निरीक्षण)(व.श्रे.), राज्य उत्पादन शुल्क, मुख्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | उपआयुक्त (औषधे व सौंदर्यप्रसाधने) (व.श्रे.), राज्य उत्पादन शुल्क, मुख्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई |

२. तसेच श्री.सुभाष बोडके यांचेकडे उपआयुक्त (निरीक्षण)(व.श्रे.),राज्य उत्पादन शुल्क, मुख्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेशापर्यंत सोपविण्यात येत आहे.

३. सदरील आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर अधिकाऱ्यांनी त्यांना बदलीने दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे. सदर अधिकारी पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांच्या विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल यांची संबंधितांनी नोंद घ्यावी. त्यानुसार सदर अधिकाऱ्यांनी

सदर पदाचा पदभार स्वीकारल्यानंतर त्याबाबतचा अहवाल आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी शासनास सादर करावा.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पुर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणतेही अर्ज स्वीकारु नये.

६. सदर बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

७. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०५३०१७४६४११०२९ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA DIGAMBARRAO AUTE

Digitally signed by RAVINDRA DIGAMBARRAO AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA DIGAMBARRAO AUTE
Date: 2025.05.30 17:47:18 +05'30'

(रविंद्र औटे)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) मा. उपमुख्यमंत्री, राज्य उत्पादन शुल्क यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) अपर मुख्य सचिव, राज्य उत्पादन शुल्क यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४) महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
५) सर्व जिल्हाधिकारी.
६) सर्व विभागीय उपायुक्त,राज्य उत्पादन शुल्क.
७) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
८) सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
९) निवडनस्ती (राउशु-१).